**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, मांडवी, ता.धडगांव, जि.नंदुरबार येथील मुलींच्या आश्रमशाळेतील स्नानगृह व शौचालय दुरुस्तीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : शाआदु-२०१०/प्र.क्र.६६/का.१३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३ फेब्रुवारी, २०१०.

<u>वाचा</u> :- आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र.इमा-०९/प्र.क्र.०७/का.८(३), दिनांक १२ जानेवारी, २०१०.

**<u>शासन निर्णय</u> :** प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, मांडवी, ता.धडगांव, जि.नंदुरबार येथील मुलींच्या आश्रमशाळेतील स्नानगृह व शौचालय दुरुस्तीबाबतचे रु.७,९७,३६६/- इतक्या रकमेचे अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यतेसाठी सादर करण्यात आले आहे.

२. सदर अंदाजपत्रक संबंधित शाखा अभियंता यांनी तयार केले असून उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, धडगांव यांनी तपासले आहे. तसेच प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा, मुख्याध्यापक, शासकीय पोस्ट बेसिक आश्रमशाळा, मांडवी, उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, धडगांव व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, शहादा यांनी साक्षांकित केले आहे.

३. उपरोक्त शासकीय आश्रमशाळेचे अंदाजपत्रक सन २००८-०९ च्या दरसूचीवर आधारित आहे. सदर काम दुरुस्तीचे असून प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांचे कार्यक्षेत्रातील उपरोक्त शाळेच्या इमारत दुरुस्तीच्या अंदाजपत्रकातील १५% सेंटेज चार्जेस वगळून रु.६,९३,३६२/- (रुपये सहा लाख त्र्याण्णव हजार तीनशे बासष्ट फक्त) इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी सु मोटो रिट याचिका क्र.१४२०/२००८ प्रकरणी वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार शासकीय आश्रमशाळांमध्ये चांगल्या सोयीसुविधा पुरविणे

आवश्यक आहे. सदर काम सुरु होण्यापूर्वी व काम पूर्ण झाल्यावर त्याचे व्हीडीओ शुटींग करण्यात यावे.

५. सदर दुरुस्तीचा खर्च सन २००९-१० या वर्षाकरिता मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

६. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अ.क्र.१ व सा.बां.विभाग नियम पुस्तिकेतील परिच्छेद १३४ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०१००२०३२०२१२८००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( गी. मो. चांदे )
अवर सचिव

**प्रति,**

आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक .
अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, धुळे .
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा.
जिल्हा कोषागार अधिकारी, नंदुरबार.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, शहादा .
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, धडगांव.
कक्ष अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.